**महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोगाची स्थापना लेखाशीर्ष २२३५ए ३११ अंतर्गत सन २०२३-२४ करीता निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**महिला व बाल विकास विभाग**
**शासन निर्णय क्र. बाहआ-२०२३/ प्र.क्र.४०/ का-९**
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक- २९/११/२०२३

वाचा-

१) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३ दि.१२ एप्रिल, २०२३
२) वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. क्र. पूरक २०२३/प्र.क्र.६२/अर्थ-३, दि. २८/७/२०२३,
३) महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय क्र. बीजीटी-२०२३/प्र.क्र.१६/का-०४, दि. २०/०४/२०२३,
४) महिला व बाल विकास विभाग,शासन निर्णय क्र. बाहआ-२०२२/प्र.क्र.५८/ का-९दि.११/०९/२०२३

**शासन निर्णय-**

महिला व बाल विकास विभागांतर्गत महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग या कार्यालयातील वेतनेतर सदरामधील खर्चाकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षामध्ये मागणी क्र. एक्स १ लेखाशीर्ष २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, १०२ बाल कल्याण, (०१) (०५) महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग, २२३५-ए-३११, या लेखाशीर्षाअंतर्गत ३१-सहायक अनुदाने वेतनेतर, या उद्दिष्टासाठी मुळ अर्थसंकल्पित रु. १४५३.०० हजार व जुलै, २०२३ च्या पावसाळी अधिवेशनामध्ये पुरवणी मागणीद्वारे मंजूर रुपये १०००.०० हजार असा एकूण रुपये २४५३.००० हजार (अक्षरी-रु. चोवीस लाख त्रेपन्न हजार फक्त) एवढा निधी उपलब्ध झाला आहे. त्यापैकी रु.१४५३.०० हजार एवढी मूळ तरतूद यापूर्वीच संदर्भाधीन क्र. ३ व ४ येथील शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात आली आहे. आता या शासन निर्णयाद्वारे पूरवणी मागणीद्वारे मंजूर रु. १०००.०० हजार (अक्षरी-रु. दहा लाख फक्त) इतका निधी उपरोक्त लेखाशिर्षाखाली आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना वितरीत करण्यात येत आहे.

(रुपये हजारात)

| अ.क्र. | बाब | अर्थसंकल्पित निधी<br>मुळ+ पुरवणी मागणीद्वारे मंजूर | वितरीत निधी | प्रस्तावित वितरण |
|---|---|---|---|---|
| १ | १ | २ | ३ | ४ |
| १ | ३१-सहायक अनुदाने | २४५३.००<br>(१४५३.००+१०००.००) | १४५३.०० | १०००.०० |
| | **एकूण** | २४५३.०० | १४५३.०० | १०००.०० |

३. सदर निधी महाराष्ट्र अर्थसंकल्पीय नियमपुस्तिका व वित्तीय अधिकार नियमपुस्तीकेमध्ये उल्लेख केलेल्या अटी व शर्तीचे पालन करुन खर्च करण्यात यावा. खर्च करताना शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३,दि.१२/०४/२०२३ मधील मार्गदर्शक सुचना व सोबतच्या परिशिष्टातील अ.क्र.९ मध्ये नमूद अटी/शर्तीची पुर्तता करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे हे राहतील. सदर निधी ज्या प्रयोजनासाठी आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल व खर्च झालेल्या निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास त्वरीत सादर करण्यात येईल याची संबंधितांनी दक्षता घ्यावी. यापुर्वी वितरीत केलेल्या अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे प्राप्त झाल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र. ३१०/व्यय-६, दि. ०८/११/२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३११२९१५५०४८९१३० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

NEELIMA PRAMOD CHAUDHARI

Digitally signed by NEELIMA PRAMOD CHAUDHARI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PLANNING DEPARTMENT, 2.5.4.20=2d492c577d5f8956310c91dc01ffb9a071206c77d27a3be4e52d7c1b29fcf933, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=AA21FB5959CBBFBF3AA97101D99F5D77D2333AE1AC39229E507A3EBF86EC6CD4, cn=NEELIMA PRAMOD CHAUDHARI
Date: 2023.11.29 15:50:58 +05'30'

**( नीलिमा चौधरी )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
२. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१ / २, मुंबई / नागपूर.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
५. आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६. सचिव, महाराष्ट्र राज्य बाल हक्क संरक्षण आयोग, वरळी
७. जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई (आयुक्तालयामार्फत)
८. कक्ष अधिकारी (का-४), महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई, यांना विनंती करण्यात येते की, सदर निधी आयुक्त, महिला व बाल विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना तात्काळ वितरीत करण्यात यावा.
९. निवड नस्ती (का-९)